**महसूल विभागातील मंडळ अधिकारी व तलाठी संवर्गातील कर्मचा-यांना कायम प्रवास भत्ता मंजूर करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रभ २०१२/ प्र.क्र.३१७/ ई-१०

३२ वा मजला, सेंटर वन इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
तारीख: २१ नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

मंडळ अधिकारी व तलाठी हे महसूल विभागाचे क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी/ कर्मचारी आहेत. महसूल विभागाव्यतीरिक्त इतर विभागाच्या योजनांचीदेखील अंमलबजावणी सदर कर्मचाऱ्यांमार्फत करण्यात येते. यासाठी सदर अधिकारी/ कर्मचारी यांना सातत्याने त्यांच्या कार्यक्षेत्रातील गावांमध्ये फिरती करावी लागते. सबब, फिरतीसाठी प्रवास करताना होणा-या प्रवासाच्या खर्चाची बिले मिळण्याकरीता प्रवास भत्ता बिले तयार करून, मंजूरीसाठी वेळेवर सादर करणे, सदर अधिकारी/ कर्मचा-यांना शक्य होत नाही. यामुळे प्रवासासाठी खर्च होणाऱ्या रकमेची प्रतिपूर्ती मिळण्यास बराच कालावधी लागतो. यामुळे अन्य काही क्षेत्रिय कर्मचाऱ्यांप्रमाणे "मंडळ अधिकारी" व "तलाठी" या संवर्गातील अधिकारी/ कर्मचा-यांना दरमहा वेतनात दैनिक भत्त्यासह कायम प्रवास भत्ता मंजूर करण्याची मागणी शासनाच्या विचाराधीन होती. सदर मागणीचा विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

महसूल विभागातील "मंडळ अधिकारी" व "तलाठी" या संवर्गातील अधिकारी/ कर्मचा-यांना रक्कम रू.१२७५/- इतका कायम प्रवास भत्ता (दैनिक भत्त्यासह) दरमहा वेतनात अनुज्ञेय करण्यात येत आहे. सदर कायम प्रवास भत्ता दि.१ सप्टेंबर, २०१४ पासून दरमहाच्या वेतनासोबत देण्यात यावा. यामुळे येणा-या अतिरिक्त खर्चास प्रत्यक्ष विधी मंडळाची मान्यता मिळाल्यानंतर व तदनुसार तरतूद झाल्यानंतरच निधी वितरीत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६०१/२०१४/ व्यय-०९, दि.१५.११.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५११३५३९९७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Vitthal Veer
Date: 2015.09.15 11:38:25 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**
**उप सचिव**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. मंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) निवडनस्ती ई-१० कार्यासन, ३२ वा मजला, सेंटर न.१ बिल्डींग, जागतीक व्यापार केंद्र कफ परेड मुंबई-०५.,